AICRP (All India Co-ordinated Research Project) on Post Harvest Technology (PHT) या केंद्र शासन पुरस्कृत योजनेस राज्य शासनाची प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी मिळणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक मपवि २००९ / प्र.क्र . ४१३ /०९/ पदुम- ४
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक :- १८ मार्च, २०१०.

वाचा :- १) All India Co-ordinated Research Project (AICRP) on Post Harvest Technology (PHT) यांचे पत्र क्र. F.No. 2(35)/2009/PHT /Mumbai/1316, Dtd.27th May 2009.
२) All India Co-ordinated Research Project (AICRP) on Post Harvest Technology (PHT) यांचे पत्र क्र. F.No. 2(37)/2009/PHT/ Date 21th July 2009
३) मपमविवि/कुलसचिव/१४०२७-२८०९, दि. २७.१०.२००९.

**प्रस्तावना :-**

All India Co-ordinated Research Project (AICRP) on Post Harvest Technology (PHT) हा उपक्रम भारत सरकार १९७२ पासून राबवत आहे. सध्या भारतातील विविध राज्यामध्ये अशा प्रकारचे ३३ संशोधन केंद्र कार्यरत असून प्रत्येक वर्षी किंवा गरजे नुसार कृषि आणि पशुसंवर्धन विभागाअंतर्गत विविध पदार्थ उत्पादीत झाल्यानंतर निर्माण होणा-या टाकाऊ पदार्थ्याचे उपयोग करुन निरनिराळे उपयुक्त पदार्थ तयार करुन शेतक-यांची शेतमजुरांची आणि संबंधित व्यवसायाशी निगडीत असणा-यांना आर्थिक लाभ व्हावा व पर्यावरणाचा समतोल राखावा आणि या क्षेत्रात काम करणा-या विविध शास्त्रज्ञांना काम करण्यास प्रोत्साहीत करण्याच्या उद्देशाने हा उपक्रम राबविण्यात येतो.

सन २००९ मध्ये नवीन मान्यता मिळालेल्या ४ उपकेंद्रापैकी महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अंतर्गत मुंबई पशुवैद्यक महाविद्यालय परळ, मुंबई येथे एका केंद्रास ICAR ने मान्यता दिली आहे.

सदर प्रकल्पास प्रशासकीय व तांत्रीक मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यानुसार खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर अंतर्गत मुंबई पशुवैद्यक महाविद्यालय, परळ, मुंबई येथील All India Co-ordinatad Research Project (AICRP) on Post Harvest Technology (PHT) हया

प्रकल्पास नियोजन विभागाकडून नियतव्यय उपलब्ध होईल या अटीच्या अधिन राहून हा प्रकल्प सन २०१०-११ या वर्षापासून कार्यान्वित करण्यास याद्वारे शासनाची प्रशासकीय व तांत्रीक मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

सदर प्रकल्पाच्या व्दिवार्षीक उपक्रमासाठी एकूण निधी १३३.३४ लक्ष एवढा निधी लागणार आहे. या निधीपैकी केंद्र शासन७५% एवढा हिस्सा देणार असून २५% हिस्सा राज्य शासनास दयावा लागणार आहे. त्याची विभागणी खालील प्रमाणे आहे.

| अ. क्र. | वर्ष | केंद्र शासनाचा हिस्सा (रुपये लाखात) | राज्य शासनाचा हिस्सा (रुपये लाखात) | एकूण (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | २०१० - ११ | ४१.६० | १३.८७ | ५५.४७ |
| २ | २०११ - १२ | ५८.४० | १९.४७ | ७७.८७ |
| | एकूण | १००.०० | ३३.३४ | १३३.३४ |

सदर प्रकल्पासाठी तीन वर्षामध्ये एकूण रु. १३३.३४ लक्ष इतका निधी लागणार असून त्या पैकी ७५ टक्के रु. १००.००लक्ष निधी केंद्र शासन देणार असून २५ टक्के रु. ३३.३४ लक्ष इतका निधी राज्य शासनास दयावा लागणार आहे. सदरचा प्रकल्प केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचने नुसार राबविण्यात यावा व प्रकल्पावर केलेल्या कामकाजाचा अहवाल वेळोवेळी केंद्र व राज्य शासनास सादर करण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९/१४१४ दिनांक ०६.२.२०१० तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३०/२०१० व्यय-२ दिनांक २०.२.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक २०१००३१८१९४८२८००१ आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( डॉ. मा.ना. सवाईसोनकांबळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल तथा कुलपती, ( महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग यांचे खाजगी सचिव,

आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य,  पुणे - १,
कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सेमिनरी हिल्स, नागपूर, ( १० प्रती)
आयुक्त बृहन्मुंबई महानगरपालीका, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
कुलसचिव /नियंत्रक महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, सेमिनरी हिल्स, नागपूर, (१० प्रती)
उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सहयोगी अधिष्ठाता, मुंबई पशुवैद्यक महाविद्यालय, परळ, मुंबई (१० प्रती)
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
वरीष्ठ प्रशासन अधिकारी गट-अ प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन नागपूर विभाग, नागपूर
वित्त विभाग व्यय -२ / अर्थसंकल्प -१४, मंत्रालय, मुंबई ३२
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई, / नागपूर
सर्व कार्यासन अधिकारी, पदुम कक्ष, कृषि व पदुम विभाग,
कार्यासन पदुम १६, कृषि व पदुम विभाग,
निवड नस्ती.